अर्थसंकल्पिय अनुदान २०१६-२०१७ (जि.प.यवतमाळ)
"२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ,१९६जिल्हा परिषद/ पंचायत संस्थांना सहाय्य - महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१, याच्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने- (स्थानिक क्षेत्र) (०१)(०७)नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारीवर्ग (२२१५१९१४)" ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) मागणी क्रमांक वाय-२.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१६/प्र.क्र.१४२/पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ३१ मार्च, २०१७

वाचा :-

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१६/प्र.क्र.८०/अर्थसंकल्प-३,दिनांक १ एप्रिल,२०१६
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल,२०१६
३) शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-२०१६/प्र.क्र.१४२/पापु-२३, दिनांक १९ ऑगस्ट, २०१६
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ८ फेब्रुवारी, २०१७
५) शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-२०१६/प्र.क्र.१४२/पापु-२३, दिनांक २० मार्च, २०१६

प्रस्तावना:-

सन २०१६-२०१७ साठी महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१६ ( महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम, २०१६ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यास विधानमंडळाने मंजूरी दिली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली असल्याचे वित्त विभागाने वाचा मधील अनुक्रमांक २ च्या परिपत्रकान्वये कळविले आहे.

२. जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग यांचे वेतन व वेतनेतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर)

(०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने-(स्थानिक क्षेत्र) (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (२२१५ १९१४)" या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष सन २०१६-१७ करिता एकूण रुपये ९,३२,१७,०००/- ( अक्षरी रुपये नऊ कोटी बत्तीस लाख सतरा हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी ३६,सहायक अनुदाने (वेतन) साठी रुपये ९,२३,६७,०००/-( अक्षरी रुपये नऊ कोटी तेवीस लाख सदुसष्ट हजार फक्त) व ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रुपये ८,५०,०००/- (अक्षरी रुपये आठ लाख पन्नास हजार फक्त ) इतकी तरतूद करण्यात आली आहे.

३. वित्त विभागाच्या अनुक्रमांक ४ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी ९०% निधी वेतनेतर साठी सन २०१६-१७ करीता विभागास उपलब्ध करुन दिला होता. त्यास अनुसरुन जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारीवर्ग यांचा वेतनेतर खर्च भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२१५ १९१४ अंतर्गत ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी एकूण अनुदान रुपये ७,६५,०००/- (अक्षरी रुपये सात लाख पासष्ट हजार फक्त) वाचा मधील अनुक्रमांक ३ व ४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले आहेत. त्यापैकी काही जिल्हा परिषदांनी रुपये ४२,०००/- (अक्षरी रुपये बेचाळीस हजार फक्त) इतके अनुदान समर्पित केले आहे. सदर अनुदान वितरणासाठी अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध असून, अतिरिक्त मागणी असलेल्या जिल्हा परिषदांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सद्यस्थितीत जिल्हा परिषद, यवतमाळ यांचेकडून अतिरिक्त मागणी प्राप्त झाली असून त्यांच्या मागणीच्या अनुषंगाने ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी विभागाकडे उपलब्ध असलेले रुपये ४२,०००/- (अक्षरी रुपये बेचाळीस हजार फक्त ) इतके अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षासाठी "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा

परिषदांना आस्थापना अनुदाने-(स्थानिक क्षेत्र) (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारीवर्ग (२२१५ १९१४) " या लेखाशिर्षाखाली ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर ) साठी रुपये ४२,०००/- (अक्षरी रुपये बेचाळीस हजार फक्त) इतके अनुदान मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यवतमाळ यांना मंजूर करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र अ मधील स्तंभ क्रमांक ६ मध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आर्थिक वर्षासाठी निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने-(स्थानिक क्षेत्र) (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारीवर्ग (२२१५ १९१४)" ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/ प्र.क्र.८९/ अर्थ-३, दिनांक २० एप्रिल,२०१६ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११७१८५५०७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish V Kove

Digitally signed by Satish V Kove
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=W.S.S.D., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, cn=Satish V Kove
Date: 2017.03.31 18:07:26 +05'30'

सतीश वि. कोवे
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद, सर्व
२. अ.मु.स./प्र.स./सचिव,विभाग सर्व,मंत्रालय,मुंबई.
३. विभागीय आयुक्त, सर्व
४. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ
६. जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी, यवतमाळ
७. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, यवतमाळ
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर व यवतमाळ
११.उप अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग, जिल्हा परिषद, यवतमाळ
१२.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१३.वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१९)
१४.कार्यासन क्रमांक पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१५.ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१६.निवड नस्ती कार्यासन पापु-२३